शेतकऱ्यांच्या उत्पादकतेसोबत उत्पन्नात वाढ करणे व त्यात सातत्य ठेवणे या बाबींवर भर देण्याच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२०/प्र.क्र. १०/२-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०४२
तारीख: २२ जानेवारी, २०२०

**संदर्भ :- मा. मंत्री कृषि व माजी सैनिक कल्याण, महाराष्ट्र राज्य यांचे दि. २१/०१/२०२० रोजीचे पत्र**

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाच्या धोरणानुसार राज्यातील कृषि विकासात शेतकरी हा केंद्र बिंदू ठेवून शासनाच्या विविध योजना अभिसारणाद्वारे (CONVERGENCE) राबविणे आवश्यक आहे. शेतकऱ्यांच्या शेतमालाची उत्पादकता व उत्पन्नात सातत्य ठेवण्याकरिता शासनाच्या विविध यंत्रणांकडून शेतकऱ्यांसाठी राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या अंमलबजावणीमध्ये समन्वय साधून त्यांचे संनियंत्रण करण्यासाठी तालुका स्तरावर समन्वय समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने, पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

शेतकऱ्यांच्या शेतमालाची उत्पादकता व उत्पन्नात सातत्य ठेवण्याकरिता शासनाच्या विविध यंत्रणांकडून शेतकऱ्यांसाठी राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या अंमलबजावणीमध्ये समन्वय साधून त्यांचे संनियंत्रण करण्यासाठी तालुका स्तरावर समन्वय समिती स्थापन करण्यात येत असून समितीची रचना खालीलप्रमाणे असेल.

**तालुका स्तरावरील शेतकरी समन्वय समिती**

**अध्यक्ष** :- १. तहसिलदार

**सदस्य सचिव** :- २. तालुका कृषि अधिकारी

**सदस्य** :- ३. गट विकास अधिकारी (BDO)

४. पशुधन विकास अधिकारी, पंचायत समिती
५. कार्यक्षतत्रातील जलसिंचन विभाग- उप अभियंता
६. कृषि विद्यापीठ /संशोधन संस्था यांचे शास्त्रज्ञ प्रतिनिधी
७. कृषि अधिकारी, पंचायत समिती
८. मत्स्यउद्योग, रेशीम, खादी ग्राम उद्योग या विभागाचे प्रतिनिधी
९. MSEB अभियंता
१०. लीड बँक प्रतिनिधी
११. सहाय्यक निबंधक सहाकारी संस्था
१२. कृषि उत्पन्न बाजार समिती सचिव
१३. प्रगतशिल शेतकरी (तीन) (किमान एक महिला)

२. समितीच्या बैठकीस विशेष निमंत्रित उपविभागीय कृषि अधिकारी व उपविभागीय अधिकारी (प्रांत) यांनी उपस्थित राहून उपरोक्त विभागाचा समन्वय साधावा व मार्गदर्शन करावे. समितीची बैठक दर ३ महिन्यांनी घेऊन बैठकीत शेतकऱ्यांचे प्रश्नांवर चर्चा करुन उपाययोजना सूचवाव्यात. या बैठकीत हवामान, पिक परिस्थीती, उत्पादकता लक्षांक, विपणन, निविष्ठांचा पुरवठा (खते, बियाणे किटकनाशके इ.) पिक कर्ज, कुटीर उद्योग, शेतकऱ्यांचे उत्पन्न वाढण्यासाठी जोडधंदे, बँकांचे शेतकरी कर्ज प्रकरणे, वीज जोडणी प्रकरणे, शासनाच्या विविध योजना या विषयांवर आढावा होणे अपेक्षित आहे. तसेच शेतकरी सन्मान व मार्गदर्शक कक्षात होणाऱ्या कामकाजासंदर्भातील चर्चा/ आढावा या समितीने घ्यावा. या संदर्भात कृषि आयुक्तालय स्तरावरुन सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात. या समितीच्या कामकाजाचा आढावा जिल्हाधिकारी यांनी त्यांचे बैठकीत नियमितपणे घ्यावा.

**३. "शेतकरी सन्मान व मार्गदर्शन कक्ष" स्थापन करणे.**

३.१ कृषि विभागाच्या सर्व कार्यालयामध्ये तालुका/जिल्हा/राज्य पातळीवरील कार्यालयात शेतकरी त्यांच्या अडचणी, तांत्रीक समस्या व मार्गदर्शन तसेच विविध योजनांच्या अंमलबजावणी अंतर्गत लाभार्थी निवड, योजनांची माहिती मिळविण्यासाठी भेट देतात. या शेतकऱ्यांना प्रस्तुत भेटीत सहाय्य करण्यासाठी एक खिडकी तत्वावर कक्ष उघडण्यात यावा.

३.२ **शेतकरी सन्मान व मार्गदर्शन कक्षामध्ये** अभ्यासू व सौजन्यशिल वर्तन असलेल्या कर्मचाऱ्यांची **जनसंपर्क व मार्गदर्शन अधिकारी** म्हणून नियुक्ती करण्यात यावी. त्याने संबधित शेतकऱ्यांचे ज्या शाखेकडे काम असेल त्या शाखेतील कर्मचाऱ्याकडून आवश्यक माहिती शेतकऱ्यांना उपलब्ध करुन द्यावी व त्याचा समन्वय प्रस्थापीत करावा.

३.३ कक्षास भेट देणाऱ्या सर्व शेतकऱ्यांची नोंद ठेवण्यात यावी. त्यात त्यांच्या समस्या / अडचणी व त्यावर केलेले मार्गदर्शन याचा समावेश करावा.

३.४ या कक्षासाठी स्वतंत्र बैठक व्यवस्था करुन तेथे पिण्याचे पाणी, शेती विषयक मासिके, वर्तमानपत्र तसेच अंमलबजावणी सुरु असलेल्या योजनांची परिपत्रके वाचण्यास ठेवावीत. या कक्षाचे सुशोभिकरण विभागाच्या महत्वाच्या योजनांचा पोस्टर व माहिती पत्रकाद्वारे करावे.

३.५ या कक्षातील कामाचा आढावा दरमहा वरीष्ठ कार्यालयाने घेऊन त्यासाठी त्यांचे स्तरावरील उपाययोजना करावी व त्यांच्या अखत्यारीत नसलेल्या बाबींसाठी वरीष्ठांचे मार्गदर्शन घ्यावे, या संदर्भात कृषि आयुक्तालय स्तरावरुन सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात.

४. उपरोक्त मार्गदर्शक सूचनांची अंमलबजावणी दि. **२३ जानेवारी, २०२०** पासून होईल याची दक्षता आयुक्त (कृषि) यांनी घ्यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२२१६३७५८८६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suhas Madhusudan Sakpal

Digitally signed by Suhas Madhusudan Sakpal
DN: CN = Suhas Madhusudan Sakpal, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Agriculture and ADF Department
Date: 2020.01.24 17:11:12 +05'30'

**( सुहास सकपाळ )**
**कक्ष अधिकारी महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,

२. मा. मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद,विधानभवन,मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव (सेवा),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे,
११. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई.
१२.प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प, पुणे
१३. उप सचिव/ सह सचिव (सर्व), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
१४. विभागीय आयुक्त (औरंगाबाद / नाशिक/ अमरावती / नागपूर विभाग)
१५. जिल्हाधिकारी (सर्व)
१६. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१७. जिल्हा अधीक्षक कृषिअधिकारी (सर्व)
१८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
१९. निवड नस्ती